**नागरी सहकारी बँकांना एकरकमी कर्ज परतफेड योजना लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९(ब)/७-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक - ०४ जुलै, २०२४

वाचा -

१. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १०.०३.२००८
२. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १४.०३.२००८
३. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. १४.०९.२०११
४. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. २३.०५.२०१२
५. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. २५.०९.२०१३
६. शासन निर्णय क्रमांकः समक्रमांक दि. २१.०१.२०१५
७. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १६.०३.२०१६
८. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १५.११.२०१७ व शुध्दीपत्रक दि. २६/२/२०१८
९. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १९.१०.२०१८.
१०. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १७.७.२०१९.
११. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १२.६.२०२०.
१२. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि. १३.८.२०२१.
१३. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि.६.६.२०२२ व शुध्दीपत्रक दि. ९.२.२०२३
१४. शासन निर्णय क्रमांक : समक्रमांक दि.२७.०४.२०२३
१५. शासन निर्णय क्रमांक: समक्रमांक दि.२७.०४.२०२३ व शुध्दीपत्रक दि. २३.०१.२०२४
१६.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.ना.बँका/१-सआ/ओटीएस/२०२३/२०२३/१६७३, दिनांक ३०.०५.२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागरी सहकारी बँकांच्या अनुत्पादक कर्जामधील प्रभावी वसुलीसाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास शिफारस केल्याप्रमाणे एकरकमी कर्ज परतफेड योजना राबविण्यास यापुर्वी वेळोवेळी शासनाने मंजुरी दिलेली आहे.

एकरकमी कर्ज परतफेड योजनेस मुदतवाढ मिळण्याबाबत अनेक नागरी सहकारी बँकांनी मागणी केली होती. नागरी सहकारी बँकांचे वाढते एन.पी.ए. कमी करण्याच्या दृष्टीने एकरकमी कर्ज परतफेड योजनेस वेळोवेळी मुदतवाढ दिल्यामुळे नागरी सहकारी बँकांचे वाढते एन.पी.ए. कमी होण्यास आतापर्यंत मदत झालेली आहे. ही बाब लक्षात घेऊन नागरी सहकारी बँकांसाठी एकरकमी कर्ज परतफेड योजनेस मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

नागरी सहकारी बॅकांच्या अनुत्पादक कर्जामधील प्रभावी वसुलीसाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहाकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. १५ च्या पत्रान्वये शिफारस केल्याप्रमाणे नागरी सहकारी बँकांसाठी एकरकमी कर्ज परतफेड योजनेस मुदतवाढ देण्याचा शासनाने निर्णय घेतलेला आहे.

**<u>शासन निर्णय:-</u>**

या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट **" अ "** मध्ये नमुद केल्याप्रमाणे नागरी सहकारी बँकांसाठी एक रकमी कर्ज परतफेड योजना राबविण्यास दि. ३१.३.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. ही योजना राबविण्यात यावी म्हणून महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या कलम-१५७ नुसार प्राप्त झालेल्या अधिकारांचा वापर करुन शासन महाराष्ट्रातील नागरी सहकारी बँकांना भारतीय रिझर्व्ह बँकेच्या मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून ही योजना अंमलात आणण्यापुरती महाराष्ट्र सहकारी संस्था नियम, १९६१ च्या नियम ४९ मधील तरतुदीमधून सूट देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०४१४३०४०५००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANJUSHA MANDAR SALVI

Digitally signed by MANJUSHA MANDAR SALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=5f3fd7897fea9717dd9115f782c19536afee03d1736a0283493a8863fadebb45, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2A02139FD3AC94FCBACD18386C5C6655556F2E876E9782822225D5F1AA558DEC, cn=MANJUSHA MANDAR SALVI
Date: 2024.07.04 14:41:54 +05'30'

**( मंजुषा साळवी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व मा. विधान सभा सदस्य / मा. विधान परिषद सदस्य, विधानभवन, मुंबई ०३२.
२. मुख्य महाव्यवस्थापक (नागरी बँका), भारतीय रिझर्व्ह बँक, सेंन्ट्रल ऑफीस, १ ला मजला, गारमेंट हाऊस, वरळी, मुंबई-१८
३. उप मुख्य सरव्यवस्थापक, भारतीय रिझर्व्ह बँक, सेंन्ट्रल ऑफीस, १ ला मजला, गारमेंट हाऊस, वरळी, मुंबई-१८
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
६. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
७. मुख्य कार्यकारी अधिकारी व सचिव, दि महाराष्ट्र अर्बन को.ऑप.बँक फेडरेशन,लि.,भारतीय क्रिडा मंदिर,४ था मजला,पीबीनं ७१२०,वडाळा,मुंबई- ०३१ .
८. अध्यक्ष, दि महाराष्ट्र अर्बन को. ऑप. बँक असोसिएशन लि. मुंबई.
९. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई त्यांना विनंती करण्यात येते की, सदरहु शासन निर्णयास व्यापक प्रसिध्दी द्यावी.
१०. निवड नस्ती.

**प्रत:- माहितीस्तव,**

१. मा. मंत्री (सहकार), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई- ४०० ०३२.
२. मा. अ.मु.स. (सहकार), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
३. निवड नस्ती, ७-स

**परिशिष्ट - अ**

**(शासन निर्णय जा.क्र. युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९(ब)/७-स, दिनांक ०४/०७/२०२४ सोबतचे)**

**नागरी सहकारी बँकांना लागू करण्यात आलेली एकरकमी कर्ज परतफेड योजना**

**१) योजनेचे नाव :- नागरी सहकारी बँकांसाठी एकरकमी कर्ज परतफेड योजना २०२४**

**२) योजनेसाठी पात्र कर्जदार -**

अ) **दि.३१/०३/२०२३** अखेर जी कर्जखाती अनुत्पादक कर्जाच्या संशयित (Doubtful) किंवा त्यावरील वर्गवारीत समाविष्ट केलेली असतील अशा सर्व कर्ज खात्यांना ही योजना लागू होईल.

ब) **दि.३१/०३/२०२३** अखेर अनुत्पादक कर्जाच्या 'सबस्टँडर्ड' वर्गवारीत समाविष्ट झालेल्या व नंतर संशयित व बुडित वर्गवारीत गेलेल्या कर्जखात्यांना देखील ही योजना लागू होईल.

क) **फसवणूक, गैरव्यवहार करून घेतलेल्या कर्ज प्रकरणामध्ये संबंधीत कर्जदारांविरुद्ध सुरू असलेल्या फौजदारी कारवाईला कोणतीही बाधा न येता सदर कर्जदार योजनेसाठी पात्र राहतील.**

**३) योजनेसाठी अपात्र कर्जदार -**

रिझर्व्ह बँकेच्या मार्गदर्शक तत्वांनुसार सदर योजना ही पुढील कर्जांना लागू होणार नाही.

अ) रिझर्व्ह बँकेच्या मार्गदर्शक तत्वांचे अथवा आदेशांचे उल्लंघन करुन वितरीत केलेली कर्जे.

ब) आजी व माजी संचालकांना व त्यांच्याशी हितसंबंध असणाऱ्या भागीदारी संस्था/कंपन्या/संस्था यांना दिलेल्या कर्जांना अथवा त्यांची जामिनकी असणाऱ्या कर्जांना रिझर्व्ह बँकेच्या पूर्व परवानगीशिवाय सदर सवलत देता येणार नाही.

क) संचालकांच्या कुटुंबातील व्यक्तिंना दिलेल्या कर्जासाठी अथवा ते जामीनदार असलेल्या कर्जांना सदर योजना लागू होणार नाही. (येथे 'कुटुंब' (Family)) म्हणजे म.स.का. कलम ७५(२) मधील स्पष्टीकरण १ मध्ये नमूद केलेप्रमाणे पत्नी, पती, वडील, आई, भाऊ, बहीण, मुलगा, मुलगी, जावई किंवा सून )

ड) पगारदारांच्या मालकांशी जर पगारकपातीचा करार झाला असेल तर अशा पगारदारांना दिलेल्या खावटी कर्जासाठी सदर योजना लागू होणार नाही.

*अपवाद – एखादी पगारदार कर्मचा-यांची कंपनी आस्थापना जर बंद झाली असेल अथवा कर्मचारी कपात योजनेनुसार (Employee Retrechment) जर कर्जदार/ जामीनदार यांची नोकरी संपुष्टात आली असेल तर अशा पगारदारांच्या कर्ज प्रकरणांना सदर योजना लागू राहील. तसेच जर पगारदार कर्मचारी (कर्जदार) मयत झाला असेल, तर अशा पगारदार कर्ज प्रकरणांना देखील सदर योजना लागू राहील.*

इ) एकरकमी कर्ज परतफेड योजनेनुसार तडजोडीची रक्कम जर रु.५० कोटी किंवा त्यापेक्षा जास्त असेल तर अशा कर्ज प्रकरणांना सदर योजना लागू करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची पूर्वपरवानगी घेणे अनिवार्य राहील.

### ४) <u>योजनेची मुदत</u>

या योजनेची मुदत दि. ३१ मार्च २०२५ पर्यंत राहील. दि. २८ फेब्रुवारी २०२५ पर्यंत प्राप्त झालेल्या अर्जांवर दि. ३१ मार्च २०२५ पर्यंत निर्णय घ्यावा लागेल.

### ५) <u>योजनेची व्याप्ती</u>

अ) ही योजना सर्व प्रकारच्या कर्जांना तसेच कर्जाव्यतिरिक्त दिलेल्या तात्पुरती उचल मर्यादा, बील डिस्काऊंट व इतर आर्थिक सवलतींना लागू होईल.

ब) कोणत्याही कायद्याअंतर्गत कारवाई चालू असणाऱ्या व कलम १०१ अन्वये वसूली दाखला प्राप्त व कलम ९१ अन्वये निवाडे प्राप्त झालेल्या कर्जांनासुद्धा ही योजना लागू होईल.

क) जेथे कर्जदाराची एकापेक्षा जास्त कर्जखाती असतील व त्यापैकी एखादे / काही कर्जखाती अनुत्पादक झाली म्हणून इतर सर्व कर्जखाती 'समूह कर्जे' म्हणून अनुत्पादक होतात. तर सर्व कर्जखात्यांना एक रकमी कर्ज परतफेड योजेची सवलत देण्यात यावी.

### ६) <u>योजनेसाठी तडजोडीचे सूत्र</u>

रिझर्व्ह बँकेने उत्पन्न संकल्पना — जिंदगीचे वर्गीकरण व अनुत्पादक जिंदगीसाठी करावयाच्या तरतुदीसाठी प्रसिध्द केलेल्या मास्टर सर्कुलर क्रमांक १२ दिनांक १/७/२०१५ नुसार कर्जखात्याचे केलेले वर्गीकरण खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र | जिंदगी वर्गीकरण | थकीत कालावधी |
|---|---|---|
| १ | सबस्टॅन्डर्ड जिंदगी ( Substandard) | अनुत्पादक झाल्यानंतर १२ महिने पर्यंत |
| २ | संशयीत-१ (Doubtful-१) | सबस्टॅन्डर्ड झाल्यानंतर १२ महिने |
| ३ | संशयीत-२ ( Doubtful-२) | संशयीत-१ झाल्यानंतर ३६ महिने पर्यंत |
| ४ | संशयीत-३ ( Doubtful-३) | संशयीत-१ झाल्यानंतर ३६ महिन्यांचे वर |
| ५ | बुडीत (Loss) | बँक, लेखापरीक्षक, सहकार विभाग यांनी प्रमाणित केलेनुसार |

अ) ज्या दिवशी संबंधित कर्जखाते हे अनुत्पादक कर्जाच्या संशयीत-१ (Doubtful-१) या वर्गवारीत वर्गीकृत केले असेल त्या दिवशीचा लेजर बॅलन्स व येणे व्याज अशी एकत्रित रक्कम येणे समजावी.

ब) <u>बँकेने द.सा.द.शे. ६% दराने सरळव्याज पध्दतीने तडजोडीच्या दिनांकापर्यंत व्याजाची आकारणी करावी.</u>

क) तडजोड रक्कम परिशिष्ट ब-१ प्रमाणे निश्चित करावी व तडजोड रक्कम उणे (Negative) येत असेल तर अशी रक्कम कर्जदारास परत न करता संबंधीत कर्जखाते या योजनेअंतर्गत बंद करावे.

ड) १) संशयीत-३ (Doubtful-३) किंवा बुडीत कर्जखात्याची येणेबाकी काढताना संशयीत-१(Doubtful-१) च्या मुददल रकमेवर द.सा.द.शे. ६% व्याजदराने सरळव्याज पध्दतीने डी-३ पर्यंतच्या कालावधीसाठी व्याजाची आकारणी करावी व त्यामध्ये डी-१ तारखेचे व्याज मिळावावे व परिशिष्ट ब-१ अनुसार तडजोड रक्कम निश्चित करावी. सदर कर्जखात्यावर संशयीत-३ (Doubtful-३) किंवा बुडीत(Loss) च्या दिनांकानंतर व्याज वसूल करण्यात येणार नाही.

२) जर तडजोड रक्कम उणे ( Negative) येत असेल तर अशी रक्कम कर्जदारास परत न करता संबंधीत कर्जखाते या योजनेअंतर्गत बंद करावे.

इ) १) मयत कर्जदाराच्या बाबतीत तडजोड रक्कम परिशिष्ट ब-२ प्रमाणे निश्चित करावी.

२) जर तडजोड रक्कम उणे (Negative) येत असेल तर अशी रक्कम कर्जदारास परत न करता संबंधीत कर्जखाते या योजनेअंतर्गत बंद करावे.

उपरोक्त सुधारणेमध्ये नमूद करण्यात आलेल्या परिशिष्ट ब-१ मध्ये- संशयीत-३ (Doubtful-३) बुडीत कर्ज खात्यासंदर्भात तडजोडीचे सूत्र व परिशिष्ट ब-२ मध्ये – मयत कर्जदारांच्या खात्यासंदर्भात तडजोडीचे सूत्र नमूद करण्यात आलेले असून सदर दोन्ही परिशिष्टे शासन निर्णयामध्ये समाविष्ट करण्यात येत आहेत.

३) दि.३१/३/२०२३ रोजी किंवा तत्पूर्वी जी कर्जखाती संशयित-३(Doubtful-३) किंवा बुडीत (Loss) या प्रकारात वर्गीकृत केली असतील व सदर कर्जदार मयत असेल तर, मयत थकीत कर्जदारांच्या वारसांकडून वसूली करताना सदरचे खाते संशयीत-१(Doubtful-१) मध्ये वर्ग झाल्याच्या दिनांकारोजीची एकूण येणे (मुददल+व्याज) रक्कम वसूल करावी.

## ७) <u>बँकांनी करावयाची कार्यवाही</u>

अ) सदर योजना स्विकारणे बँकांवर बंधनकारक नाही. मात्र सदर योजना स्विकारल्यानंतर ती सर्व कर्जदारांमध्ये कोणताही भेदभाव न करता समान पद्धतीने लागू करण्याचे बंधन बँकांवर राहील.

ब) सदर योजना स्वीकारावयाची अथवा नाही याचा निर्णय बँकांनी घ्यावयाचा आहे. मात्र योजना स्वीकारल्यानंतर त्या संदर्भातील संचालक मंडळाचा ठराव, योजना जाहीर केल्यानंतर जिल्हा उपनिबंधकांकडे ३० दिवसांत सादर करणे आवश्यक राहील.

क) योजना स्वीकारल्यानंतर त्याची माहिती सर्व शाखांच्या नोटीस बोर्डवर लावणे बँकांना बंधनकारक आहे. तसेच ग्राहकांनी मागणी केल्यास या योजनेची प्रत देण्याचे बंधन बँकांवर राहील.

ड) योजनेच्या अंमलबजावणीसाठी बँकेचे अध्यक्ष, दोन/तीन संचालक व मुख्य कार्यकारी अधिकारी हे त्या उपसमितीचे सदस्य असतील. सदर समितीने मंजूर केलेल्या प्रकरणांना संचालक मंडळाच्या पुढील सभेमध्ये मान्यता घेणे आवश्यक राहील.

इ) या योजनेअंतर्गत नामंजूर करण्यात येणा-या सर्व कर्जदारांना कारणासह नामंजूरीचे पत्र देणे बँकांवर बंधनकारक राहील.

ई) एन.पी.ए. ची तारीख व वर्गवारी बँकेच्या दफ्तराप्रमाणे व लेखापरिक्षकांनी प्रमाणित केल्याप्रमाणे निश्चित करण्यात यावी. कर्ज परतफेडी संबंधी बाबींमधील वाद महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम ९१ अंतर्गत सोडविण्याची तरतूद आहे. त्याप्रमाणे सदर योजनेचा

लाभ देणेचे अनुषंगाने अगर तडजोड रकमेबाबत काही वाद निर्माण झाल्यास त्याबाबत संबंधित तरतूदीप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

फ) तडजोड रकमेचा भरणा कर्जदारांनी त्याच बँकेतून नवीन कर्ज घेऊन करावयाचा नाही. बँकेतील अशा इतर कोणत्याही कर्जातून तडजोड रकमेचा भरणा झाल्यास, त्याकरीता संचालक मंडळास जबाबदार धरुन कारवाई करण्यात येईल.

ग) सदर कर्ज परतफेड योजनेअंतर्गत कर्जखाते बंद करताना संबंधित कर्जदारास नव्याने कर्ज / सवलत देता येणार नाही. कर्जदारास पुढील ५ वर्षापर्यंत बँकेकडून कोणत्याही प्रकारचे कर्ज / सवलत घेता येणार नाही तसेच तो बँकेतील कोणत्याही कर्जास / सवलतीस ५ वर्षे जामीन राहू शकणार नाही.

ह) सदर योजनेअंतर्गत अर्जामध्ये नमूद करण्यासाठी कर्जदाराने आपल्या कर्जखात्याची (लेजर) माहिती मागितल्यास बँकेने सदरची माहिती कर्जदारास तात्काळ उपलब्ध करुन दयावी.

**८) <u>परतफेड करण्यासाठी कालावधी</u>**

अ) कर्जदाराने नागरी सहकारी बँकांसाठी एक रकमी कर्ज परतफेड योजने नुसार करावयाच्या अर्जासोबत, सदर कर्ज प्रकरण ज्या दिवशी अनुत्पादक कर्जाच्या संशयीत-१ (Doubtful-१) या वर्गवारीत वर्गीकृत केले असेल, त्या दिवशीच्या लेजर बॅलन्सच्या (मुददल + व्याज) किमान ५% रक्कम भरणे आवश्यक आहे.

ब) i) नागरी सहकारी बँकांसाठी एक रकमी परतफेड योजनेअंतर्गत अर्ज मंजूरीचे पत्र प्राप्त झाल्यापासून कर्जदाराने एक महिन्यात तडजोडीची सर्व रक्कम भरणे आवश्यक आहे.

अथवा

ii) नागरी सहकारी बँकांसाठी एकरकमी कर्ज परतफेड योजनेअंतर्गत अर्ज मंजूरीचे पत्र प्राप्त झाल्यापासून एक महिन्याचे आत कर्जदाराने तडजोड रकमेच्या किमान २५% रक्कम भरल्यास उर्वरित रक्कम भरण्यास पुढील जास्तीत जास्त ११ मासिक हप्त्यांचा कालावधी देता येईल. कर्जदाराने १ महिन्यांत २५% रक्कम न भरल्यास सदर योजनेचा लाभ घेणेस कर्जदाराने नकार दिला आहे असे समजून कर्जदाराने अर्जासोबत भरणा केलेली ५% रक्कम बँकांनी मुददलात जमा करुन घेतली जाईल.

iii) उर्वरित ७५% रकमेचा भरणा पुढील ११ मासिक हप्त्यामध्ये करावयाचा असून, त्यास द.सा.द.शे. ६% सरळव्याज पध्दतीने व्याजाची आकारणी केली जाईल. या कालावधीत कोणताही हप्ता भरण्यास उशीर झाल्यास त्यावर उशीर झालेल्या मुदतीसाठी व उशीर झालेल्या रकमेवर द.सा.द.शे. २% दंड व्याज आकारण्यात येईल.

क) प्रथम १२ महिन्यांच्या कालावधीत तडजोड रकमेचा संपूर्ण भरणा अर्जदाराने न केल्यास, उर्वरीत रकमेसाठी त्यास जास्तीत जास्त १२ महिन्यांचा जादा कालावधी दिला जाईल व अशा कालावधीसाठी उर्वरीत रकमेवर द.सा.द.शे. १०% व्याजदर आकारला जाईल. या वाढीव कालावधीत कोणताही हप्ता भरण्यास उशीर झाल्यास त्यावर उशीर झालेल्या मुदतीसाठी व उशीर झालेल्या रकमेवर द.सा.द.शे. २% दंड व्याज आकारण्यात येईल.

ड) वरीलप्रमाणे जास्तीत जास्त २४ महिन्यात तडजोड रकमेचा भरणा अर्जदाराने न केल्यास, अर्जदारास दिलेली सवलत रद्द करुन त्यांनी यापूर्वी भरणा केलेली सर्व रक्कम प्रथम थकित व्याजापोटी व नंतर मुद्दलापोटी वसूल करुन नियमित व्याजासह व इतर सर्व खर्चासह सर्व येणे रक्कम वसूल करण्याचा अधिकार बँकेस राहील.

**९) <u>योजनेसंबंधी इतर तरतुदी</u>**

अ) या योजनेत बदल करण्याचा अधिकार बँकांना असणार नाही.

ब) सदर योजना स्वीकारल्यानंतर ती सर्व कर्जदारांना कोणताही भेदभाव न करता समान पद्धतीने लागू करण्याचे बंधन बँकांवर राहील.

क) एक रकमी कर्ज परतफेड योजनेअंतर्गत सवलत मिळणाऱ्या कर्जखात्यांना महाराष्ट्र सहकार नियम १९६१ चे नियम ४९ अंतर्गत नमूद केलेली निर्लेखनाची प्रक्रिया लागू होणार नाही.

ड) या योजनेअतर्गत तडजोड केलेल्या खात्यांची सर्व माहिती वार्षिक साधारण सभेने नोंद घेण्यासाठी पुढील वार्षिक सभेस, स्वतंत्र विषयाद्वारे देण्याचे बंधन बँकांवर राहील.

इ) या योजनेअतर्गत होणाऱ्या वसुलीवर सरचार्ज लागणार नाही.

फ) जामीनदार हे सहकर्जदार असल्याने या योजनेअंतर्गत कर्जदाराने अर्ज केला नाही तर तो जामीनदारांनाही अर्ज करता येईल.

ग) सदर योजना ही राज्यातील मल्टीस्टेट सहकारी बँका सोडून इतर सर्व नागरी सहकारी बँकांना लागू राहील.

ह) या योजनेबाबत परिशिष्ट ब (तडजोडीचे सुत्र), परिशिष्ट क (अर्जदाराने करावयाचा अर्जाचा नमुना), परिशिष्ट ड (मंजूरी पत्राचा नमुना), परिशिष्ट इ (वार्षिक सर्वसाधारण सभेसमोर द्यावयाची माहिती), परिशिष्ट ब१ (बुडीत कर्जखात्यासंदर्भात तडजोडीचे सुत्र), परिशिष्ट ब२ (मयत कर्जदाराच्या कर्जखात्यासंदर्भात तडजोडीचे सुत्र) जोडली आहेत.

**१०) योजनेची प्रसिध्दी व प्रचार :-**

या योजनेचा अधिकाधिक कर्जदारांना व बँकांना फायदा घेता यावा व बँकेकडील एन.पी.ए. कमी होण्यास मदत व्हावी या दृष्टीने आवश्यक ती प्रसिध्दी व प्रचाराची मोहिम नागरी बँकांच्या संघीय संस्थांनी हाती घ्यावी.

११) योजनेचे संनियंत्रण व अहवाल सादर करणे.

सदर योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याचे दृष्टीने सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वेळोवेळी आढावा घेऊन या योजनेचे संनियंत्रण करावे व योजनेच्या प्रगती व फलनिष्पत्तीबाबत संबंधीत संस्था व क्षेत्रीय यंत्रणांकडून माहिती घेऊन दर तीन महिन्यांनी शासनास अहवाल सादर करावा.

MANJUSHA MANDAR SALVI

Digitally signed by MANJUSHA MANDAR SALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=5f3fd7897fea9717dd9115f782c19536afee03d1736a0283493a8863fadebb45, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2A02139FD3AC94FCBACD18386C5C6655556F2E876E9782822225D5F1AA558DEC, cn=MANJUSHA MANDAR SALVI
Date: 2024.07.04 14:42:18 +05'30'

**(मंजुषा साळवी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

## परिशिष्ट ब

**(शासन निर्णय जा.क्र. युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९(ब)/७-स, दिनांक ०४/०७/२०२४ सोबतचे)**

## 'तडजोडीचे सूत्र'

**उदाहरण :-**

| अ.क्र. | कर्जदाराची कर्जखाती | | अनुत्पादक कर्जे |
|---|---|---|---|
| १. | मुदत कर्ज | रु.५.०० लाख | ५.०० लाख |
| २. | खेळते भांडवल | रु.३.०० लाख | - - |
| ३. | बील डिस्काऊंटींग | रु.१.०० लाख | - - |
| | एकूण कर्जे | रु.९.०० लाख | ५.०० लाख |

| | | | |
|---|---|---|---|
| D-१ चे मुद्दल | - | रु.५.०० लाख | |
| अधिक | | | |
| D-१ चे येणे व्याज | - | रु.१.०० लाख् | |
| **D-१ चे एकूण येणे** | - | रु.६.०० लाख | (अ) |
| अधिक | | | |
| रु.५ लाखावर (म्हणजेच केवळ मुददलावरच ) तडजोडीच्या दिनांकापर्यंत ( दि.३१/३/२०२३ गृहीत) **द. सा. द.शे. ६% दराने** सरळ व्याज | - | रु.१.५० लाख | |
| अधिक | | | |
| अ.जाहीरात खर्च | | रु. ०.१० लाख | |
| ब.विमा खर्च | | रु.०.०५लाख | |
| क. न्यायालयीन बाबींसाठी केलेला प्रत्यक्ष खर्च | | रु.०.३५लाख | |
| एकूण (अ+ब+क) | - | रु.०.५० लाख | |
| **एकूण येणे** | - | रु.८.०० लाख | (ब) |
| वजा | | | |
| D-१ नंतर बँकेत भरणा केलेली रक्कम | - | रु.१.५० लाख | |
| **तडजोड रक्कम** | - | रु.६.५० लाख | (क) |

**टीप** - १) वर कलम (अ) मधील रकमेच्या ५% रक्कम अर्जदाराने अर्ज करतेवेळी भरणा करणे आवश्यक आहे

# परिशिष्ट क

**(शासन निर्णय जा.क्र. युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९(ब)/७-स, दिनांक ०४/०७/२०२४ सोबतचे)**
**अर्जदाराने करावयाच्या अर्जाचा नमुना'**

दि. / /

प्रति,
**मा. मुख्य कार्यकारी अधिकारी**
- - - - - - नागरी सहकारी बँक लि.

**विषय** - शासन निर्णय दिनांक / / नुसार नागरी सहकारी बँकांसाठी 'एकरकमी कर्ज परतफेड योजना-२०२४'अंतर्गत सवलत मिळणेबाबत विनंती अर्ज.

**संदर्भ** - माझे थकित कर्जखाते क्र. - - - - - - - शाखा - - - - - - - - -

महोदय/महोदया,

माझे उपरोक्त संदर्भित कर्जखाते क्र. - - - - थकित असून, बँकेच्या पुस्तकात अनुत्पादक कर्जाच्या 'संशयित-१' (Doubtful-१) या वर्गवारीत वर्गीकृत केली आहेत.
*माझ्या कर्जखात्यांचा तपशील पुढीलप्रमाणे :-*

| *अ.क्र.* | *कर्जखात्याचा प्रकार* | *अनुत्पादक कर्जाचे वर्गीकरण* | *डी-१ ची थकीत रक्कम (मुददल + व्याज)* |
|---|---|---|---|
| १ | | | |
| २ | | | |

सदर कर्जखात्यावरील येणे रक्कम मला शासन निर्णय दिनांक / / नुसार नागरी सहकारी बँकांसाठी 'एकरकमी कर्ज परतफेड योजना २०२४' अंतर्गत भरावयाची असून, या योजनेअंतर्गत मी देय असणारी तडजोडीची रक्कम मला त्वरित कळवावी.

मी, ________________________________ शपथपूर्वक सांगतो की, नागरी सहकारी बँकांसाठी 'एकरकमी कर्ज परतफेड योजना २०२४' च्या सर्व अटी व शर्ती मी वाचल्या असून, त्या मला मान्य आहेत व मी त्यांचे पालन करण्याची हमी देतो तसेच मी केलेल्या या अर्जास, माझ्या कर्जास जामीनदार असलेल्या सर्वांची मान्यता आहे.

सदर योजनेचा लाभ घेतल्यानंतर पुढील ५ वर्षापर्यंत बँकेकडून कोणत्याही प्रकारचे कर्ज / सवलत मला घेता येणार नाही तसेच इतर कोणत्याही कर्जास / सवलतीस पुढील ५ वर्ष मी जामीन राहू शकणार नाही याची मला कल्पना असून त्यास माझी मान्यता आहे.

सदर योजनेतीत अटींनुसार, अर्जासोबत मी माझ्या संबंधित कर्जखात्यांवर D-I रोजी येणे असलेल्या लेजर बॅलन्स + त्या दिवसांपर्यंतचे येणे व्याज अशा रु. इतक्या येणे रकमेच्या ५% म्हणजेच रु. चा डिमांड ड्राफ्ट / पे-ऑर्डर सोबत जोडत आहे / रोख भरणा केलेला आहे.

तरी माझ्या अर्जाचा सहानुभूतिपूर्वक विचार करुन शासन निर्णय क्रमांक - - - दिनांक / / मधील एक रकमी कर्ज परतफेड योजनेची सवलत मला दयावी अशी विनंती आहे.

कळावे,

आपला विश्वासू,
सही/-
**(कर्जदाराचे नाव)**
**कर्जखाते क्र.**

**शाखेचे नाव**

## परिशिष्ट ड

**(शासन निर्णय जा.क्र. युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९/७-स, दिनांक ०४/०७/२०२४ सोबतचे)**

**मंजूरी पत्राचा नमुना**

दि. / /

**प्रति,**

**अर्जदार श्री.-** - - - - - -

**विषय** - शासन निर्णय दिनांक / / नुसार नागरी सहकारी बँकांसाठी 'एकरकमी कर्ज परतफेड योजने'अंतर्गत सवलत मिळणेबाबत विनंती अर्ज.

**संदर्भ** - १) आपला दि. / / रोजीचा विनंती अर्ज.

२) आपले थकित कर्जखाते क्र. - - - - - - - - शाखा - - - - - - - - - .

महोदय/महोदया,

आपल्या उपरोक्त संदर्भित अर्जानुसार नागरी सहकारी बँकांसाठी एकरकमी कर्ज परतफेड योजना समितीने / संचालक मंडळाने, दि. / / . रोजीच्या सभेतील ठराव क्र. नुसार आपणांस नागरी सहकारी बँकांसाठी 'एकरकमी कर्ज परतफेड योजना-२०२४' अंतर्गत रु. /- इतकी 'तडजोड रक्कम' (Settlement Amount) निश्चित केली असून, यापोटी आपण अर्जासोबत भरलेली रक्कम रु. /- बँकेस दि. / / रोजी प्राप्त झाली आहे. उर्वरित रकमेचा भरणा आपण पुढीलप्रमाणे करावयाचा आहे.

| अ.क्र. | तपशील | रक्कम रुपये |
|---|---|---|
| अ) | तडजोड रक्कम तात्काळ भरणा केल्यास | रु. |
| ब) | तडजोड रकमेच्या २५% रक्कम | रु. |

**परतफेडी संबंधी अटी व शर्ती**

i) नागरी सहकारी बँकांसाठी एक रकमी परतफेड योजना २०२४ अंतर्गत अर्ज मंजूरीचे पत्र प्राप्त झाल्यापासून कर्जदाराने एक महिन्यात तडजोडीची सर्व रक्कम भरणे आवश्यक आहे. अथवा

ii) नागरी सहकारी बँकांसाठी एकरकमी कर्ज परतफेड योजना २०२४ कर्जदारास मंजूर केल्यानंतर कर्जदाराने तडजोड रकमेच्या किमान २५% रक्कम मंजूरीच्या दिनांकापासून एक महिन्याचे आत भरल्यास उर्वरित रक्कम भरण्यास पुढील जास्तीत जास्त ११ मासिक हप्त्यांचा कालावधी देता येईल. १ महिन्यांत २५% रक्कम न भरल्यास सदर योजनेचा लाभ घेणेस कर्जदाराने नकार दिला आहे असे समजून कर्जदाराने अर्जासोबत भरणा केलेली ५% रक्कम बँकांनी मुददलात जमा करुन घेतली जाईल.

iii) उर्वरित ७५% रकमेचा भरणा पुढील ११ मासिक हप्त्यामध्ये करावयाचा असून, त्यास **द.सा.द.शे.६%** दराने सरळव्याज पध्दतीने व्याजाची आकारणी केली जाईल. यावेळी कोणताही हप्ता भरण्यास उशीर झाल्यास त्यावर उशीर झालेल्या मुदतीसाठी व उशीर झालेल्या रकमेवर द.सा.द.शे. २% दंड व्याज आकारण्यात येईल.

कळावे

आपला विश्वासू,

सही/-

**(प्राधिकृत अधिकारी)**

**नागरी सहकारी बँक**

**सोबत** - तडजोड रकमेची गणिते (Calculations)

## परिशिष्ट इ

**(शासन निर्णय जा.क्र. युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९(ब)/७-स, दिनांक ०४/०७/२०२४ सोबतचे)**

**'वार्षिक सर्वसाधारण सभेसमोर द्यावयाची माहिती'**

**विषय** - महाराष्ट्र शासनाच्या नागरी सहकारी बँकांसाठी 'एकरकमी कर्ज परतफेड योजना-२०२४ ' शासन निर्णय क्रमांक - - दिनांक / / अंतर्गत तडजोड केलेल्या थकित कर्जखात्यांची माहिती देणे व संचालक मंडळाच्या निर्णयाची नोंद घेणे. (कालावधी दि.१/४/२०- - ते दि.३१/३/२०- - )

---

१) तडजोड झालेल्या एकूण कर्जखात्यांची संख्या -

२) तडजोड झालेल्या खात्यामधील एकूण कर्ज मंजूर रक्कम - रु.

३) तडजोड झालेल्या खात्यावरील दि.३१/३/२०—अखेरीचे एकूण येणे

( मुददल + व्याज) - रु.

४) संबंधित तडजोड खात्यांवर आजपर्यंतचे एकूण येणे व्याज - रु.

५) संबंधित तडजोड खात्यांमध्ये आजपर्यंत वसूल झालेली रक्कम (मुददल+व्याज) रु.

६) संबंधीत तडजोड खात्याची आजपर्यंतची एकूण येणे रक्कम - रु.

७) संबंधीत तडजोड खात्यावर बँकेने दिलेली येणे व्याजातील एकूण सूट - रु.

---

**टीप** - सदर विषय हा केवळ नोंद घेण्याचा असल्याने यासंबंधी सूचक व अनुमोदक घेऊन ठराव मंजूर करण्याची आवश्यकता नाही.

## परिशिष्ट ब (१)

**( शासन निर्णय युआरबी-१८०७/प्र.क्र.४५९/(ब)/७-स दि. ०४/०७/२०२४ सोबतचे संशयीत-३ (Doubtful-३) बुडीत कर्ज खात्यासंदर्भात तडजोडीचे सूत्र)**

उदाहरण-

| अ.क्र. | कर्जदाराची खाती | | अनुत्पादक कर्जे |
|---|---|---|---|
| १. | मुदत कर्ज | रु.५.०० लाख | रु.५.००लाख |
| २. | खेळते भांडवल | रु.३.००लाख | --- |
| ३. | बील डिस्काऊंटींग | रु.१.००लाख | --- |
| | एकूण कर्ज | रु.९.००लाख | रु.५.००लाख |

| | |
|---|---|
| D-१ चे मुद्दल | रु ५.००-लाख |
| अधिक | |
| D-१ चे येणे व्याज | रु.१.००लाख |
| D-१ चे एकूण येणे | रु.६.००लाख (अ) |
| अधिक | |
| रु ५.लाखावर (म्हणजेच केवळ मुददलावरच ) | |
| D-१ पासून D-३ पर्यंत दसादशे ६% दराने | |
| सरळव्याज ( अंदाजे ) | रु.१.५०लाख |
| D-३ दिनांकाअखेरची येणे बाकी | रु.७.५०लाख |

अधिक

| | |
|---|---|
| अ.जाहिरात खर्च | रु.०.१०लाख |
| ब. विमा खर्च | रु.०.०५लाख |
| क. न्यायालयीन बाबीसाठी केलेला प्रत्यक्ष खर्च | रु.०.३५लाख |
| एकूण खर्च रक्कम | रु.०.५०लाख |
| एकूण येणे | रु.८.००लाख (ब) |

वजा

D-१ चे नंतर तडजोडच्या तारखेपर्यंत कर्जदाराने बँकेत भरणा केलेली रक्कम रु.१.५०लाख

तडजोड रक्कम - रु.६.५०लाख (क)

( टीप-१) वर कलम(अ) मधील रकमेच्या ५% रक्कम अर्जदाराने अर्ज करतेवेळी भरणा करणे आवश्यक आहे